महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा) गट-ब
मधील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या-
अधीक्षक व तत्सम

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली- ३१२०/प्र.क्र.७१/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ नोव्हेंबर, २०२०

वाचा:- शा.शि.व क्री.वि., शासन निर्णय.क्र.ईएसटी-३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२, दि.१७.०३.२०१७

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अंमलात आले आहे. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, या कलमाखाली त्याचे अधिकार त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याचा निर्णय दिनांक ३० मे, २०१५ च्या शासन निर्णयाद्वारे घेण्यात आलेला आहे.

२. सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदीनूसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या पूर्व मान्यतेने खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची विनंतीवरुन बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्रीमती राजेश्वरी भालचंद्र संधानसिवे | अधीक्षक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, पुणे | अधीक्षक (प्राथमिक), वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, जळगांव | महसूल संवर्ग नियम २०१५ मधील नियम १२ मधील तरतूदी नुसार पुणे महसूल संवर्ग बदलून नाशिक महसूली संवर्गात विनंतीने रिक्त पदी |

३. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०४१६२५१९३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2020.11.05 13:39:42 +05'30'

**( दीपक शेलार )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय (मध्यवर्ती इमारत) महाराष्ट्र राज्य, पुणे
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद पुणे / जळगांव
३. सर्व शिक्षण संचालक
४. विभागीय शिक्षण उपसंचालक पुणे / नाशिक
५. संबंधित शिक्षणाधिकारी (माध्यमिक, प्राथमिक, निरंतर शिक्षण)
६. जिल्हा कोषागार अधिकारी पुणे / जळगांव
७. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक.
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवड नस्ती, प्रशा-२.